मा.लोकअदालतीसमोर जास्तीत जास्त भूसंदर्भ व अपील प्रकरणे सादर करुन त्यामध्ये तडजोड घडवून आणण्याच्या अनुषंगाने दक्षता घेण्याबाबत.

दिनांक १२.०३.२०२२, ०७.०५.२०२२, १३.०८.२०२२ व १२.११.२०२२ रोजीची आयोजित लोकअदालत.

महाराष्ट्र शासन

महसूल व वन विभाग

**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र. २५/अ-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक:- १६ फेब्रुवारी, २०२२.

**वाचा :-** १) शासन निर्णय क्र.एलक्यूएन-०१/२०११/प्र.क्र.३०/अ-२, दिनांक १३.१०.२०११ व शुद्धीपत्रक दि. १८.२.२०१२

२) शासन परिपत्रक क्र.एलक्यूएन-०१/२०११/प्र.क्र.३०/अ-२, दि. १७.१२.२०११

३) शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१४/प्र.क्र.४१/भाग-१/अ-४, दिनांक ०३.११.२०१६ व शुद्धीपत्रक दि. २३.२.२०१७, ४.५.२०१७, ११.५.२०१८ व १३.८.२०१८

४) शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१७/PIL-३४/प्र.क्र.१०४/भाग-१/अ-४, दिनांक २८.०२.२०१८ व दिनांक ३.०४.२०१८

५) शासन परिपत्रक समक्रमांक दिनांक २६.०७.२०२१ व ८.०९.२०२१

**शासन परिपत्रक:-**

मा. जिल्हा/दिवाणी न्यायालय तसेच मा.उच्च न्यायालयात भूसंपादनाबाबतची प्रकरणे मोठया प्रलंबित आहेत. सदर प्रकरणे तातडीने तडजोडीने निकाली काढणे गरजेचे ठरते. जेणेकरुन त्यावर द्याव्या लागणा-या व्याजाचा भूदंड शासनावर पडणार नाही व त्यामुळे शासनाची आर्थिक बचत होण्यास मदत होईल. तसेच त्यामुळे मा. न्यायालयापुढील प्रलंबित प्रकरणांची संख्या कमी होण्यासही मदत हाईल. मा. न्यायालयापुढील प्रलंबित प्रकरणांची संख्या लक्षात घेवून मा. मुख्य न्यायाधिश, उच्च न्यायालय, मुंबई यांनी भूसंपादनाबाबची प्रकरणे तडजोडीने निकाली काढण्यासाठी उच्च स्तरीय तज्ञ समिती नेमण्याबाबत शासनास कळविलेले होते. त्याअनुषंगाने मा. न्यायालयात प्रलंबित असलेली कलम १८ खालील प्रकरणे लोकअदालती समोर तडजोडीसाठी ठेवण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णय /शासन परिपत्रके या अन्वये स्वयंस्पष्ट शासन निर्देश देण्यात आलेले आहेत.

मा.न्यायालयातील वर नमूद केलेली प्रकरणे मा.लोकअदालतीसमोर ठेवून त्यामध्ये संपादक संस्थेच्या संमतीने तडजोड घडवून आणल्यामुळे मा.न्यायालयातील प्रलंबित भूसंदर्भ व प्रलंबित अपील प्रकरणे कमी होण्यास मदत होईल. तसेच १५% दराचा व्याजाचा भूर्दंड व न्यायालयीन प्रकरणी होणारा खर्च कमी होणे याबाबीं विचारात घेता लोकअदालतीसमोर संमतीने तडजोड घडवून आणणे ही एक प्रभावी उपाययोजना आहे. तथापि त्यासाठी संपादक संस्थेच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून आवश्यक तो प्रतिसाद मिळत नसल्याची, तसेच मा.लोकअदालतीमध्ये तडजोड झालेल्या प्रकरणी आवश्यक तो निधी संबंधित संपादक संस्थेकडून विहित कालावधीत उपलब्ध होत नसल्याची बाबही शासनाच्या निदर्शनास आणण्यात आलेली आहे.

तरी दिनांक १२.०३.२०२२, ०७.०५.२०२२, १३.०८.२०२२ व १२.११.२०२२ रोजी आयोजित लोकअदालतीमध्ये मा. जिल्हा/दिवाणी न्यायालयातील प्रलंबित भूसंदर्भ प्रकरणे, तसेच मा.उच्च न्यायालयातील प्रलंबित अपील प्रकरणे सादर करुन जास्तीत जास्त प्रकरणी तडजोड घडवून आणण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्देश देण्यात येत आहेत.

१) संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाने संबंधित प्रकरणाशी निगडीत संपादक संस्थेच्या सक्षम अधिकाऱ्यांसमवेत एकत्रित बैठक तातडीने /विहित कालावधीत आयोजित करण्यात यावी.

२) लोकअदालतीमध्ये संबंधित प्रकरणी तडजोड घडवून आणण्याची निकड व त्यायोगे होणारा शासन महसूलाची बचत या बाबी संपादक संस्थेच्या अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणण्यात यावी.

३) लोकअदालतीमध्ये संबंधित प्रकरणी तडजोड घडवून आणण्यासाठी संपादक संस्थेच्या सक्षम अधिकाऱ्यांची संमतीची आवश्यकता संबंधितांच्या निदर्शनास आणण्यात यावी.

४) लोकअदालतीसमोरील तडजोडीच्या वेळेस संपादक संस्थेच्या सक्षम अधिकाऱ्यांची उपस्थिती असणे बंधनकारक असेल.

५) लोकअदालतीमध्ये तडजोड होणाऱ्या प्रकरणांशी संबंधित निधी संपादन संस्थेने/ संबंधित प्रशासकीय विभागांनी तडजोडीच्या दिनांकापासून ६ महिन्यात उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

६) लोकअदालतीमध्ये तडजोड झालेल्या प्रकरणी निधी उपलब्ध करुन देण्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित संपादक संस्था / प्रशासकीय विभाग यांची राहील.

७) विहित कालावधीत निधी उपलब्ध करुन न दिल्यास त्याअनुषंगाने उदभवणाऱ्या पुढील अडचणीस संबंधित संपादक संस्था / प्रशासकीय विभाग जबाबदार राहतील.

तरी सर्व जिल्हाधिकारी यांनी तसेच संबंधित संपादक संस्थेच्या सक्षम अधिकाऱ्यांनी सदर लोकअदालतीमध्ये जास्तीत जास्त प्रकरणे ठेवून त्यामध्ये संबंधित शेतकऱ्यांशी संमती प्राप्त करुन तडजोड करण्यासाठी कसोशीने/ दक्षतेने कार्यवाही करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०२१६१७००२७७११९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SANJAY SHANKARRAO INGLE
Date: 2022.02.16 17:02:50 +05'30'

**( संजय इंगळे )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत-**

१) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग

२) सर्व विभागीय आयुक्त

३) सर्व जिल्हाधिकारी

४) सर्व महानगरपालिका आयुक्त

५) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण.

६) व्यवस्थापकीय संचालक, शहर व औद्योगिक विकास महामंडळ महाराष्ट्र.

७) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण

८) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ.